**अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींकरिता बांधण्यात येत असलेल्या वसतीगृहांच्या व्यवस्थापनाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वसगृ-२०१२/प्र.क्र.१६८/का.८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २८ जुलै, २०१५.

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. मौआम-२००९/प्र.क्र.१५/का.८, दि.०२.०३.२०१०**
२) **शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. वसगृ-२०१२/प्र.क्र.१६८/का.८, दि.२१ जून, २०१३**
३) **शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. वसगृ-२०१२/प्र.क्र.१६८/का.८, दि.०५ सप्टेंबर, २०१४**
४) **शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. वसगृ-२०१५/प्र.क्र.७१/का.८, दि.११ मे, २०१५.**

**प्रस्तावना :-**

अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थीनींकरिता राज्यातील प्रत्येक जिल्हयात बांधण्यात येत असलेल्या वसतीगृहाच्या व्यवस्थापनाबाबत दि.२१ जून, २०१३ च्या शासन निर्णयाव्दारे सविस्तर सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. यामध्ये प्रवेश शुल्काबाबतदेखील सूचना देण्यात आलेल्या आहेत. दि.०५ सष्टेंबर, २०१४ च्या शासन निर्णयाव्दारे या शुल्कामध्ये सुधारणा करण्यात आलेली आहे. बांधून पूर्ण झालेली वसतीगृहे सन २०१५-१६ मध्ये सुरु करण्यात येणार आहेत. काही वसतीगृहांची प्रवेशक्षमता १०० विद्यार्थीनी इतकी आहे. तर काही वसतीगृहाची प्रवेशक्षमता ३० व ६० अशी आहे. त्यामुळे दि.२१ जून, २०१३ च्या शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या, विद्युत, पाणी व कार्यालयीन खर्च यासाठी निर्धारित केलेले वार्षिक अनुदान रु.६.०० लाख यामध्ये प्रवेशक्षमतेच्या प्रमाणात बदल करण्याची बाब तसेच सदर वसतीगृहामध्ये प्राप्त होणारा निधी कशाप्रकारे ठेवण्यात यावा, याबाबतच्या सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या वसतीगृहात प्राप्त होणारा निधी व वसतीगृहामार्फत होणारा खर्च याचे लेखे ठेवणे याकरिता खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

(१) काही वसतीगृहांची प्रवेशक्षमता १०० विद्यार्थीनी इतकी आहे. तर काही वसतीगृहाची प्रवेशक्षमता ३० व ६० अशी आहे. त्यामुळे दि.२१ जून, २०१३ च्या शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या, विद्युत, पाणी व कार्यालयीन खर्च यासाठी निर्धारित केलेले वार्षिक अनुदान रु.६.०० लाख यामध्ये प्रवेशक्षमतेच्या प्रमाणात पुढीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | वसतीगृहातील विद्यार्थ्यांची प्रवेशक्षमता | विद्युत पाणी व कार्यालयीन खर्च (रुपये लाखात) |
|---|---|---|
| १ | ३० | ३.०० |
| २ | ६० | ४.०० |
| ३ | १०० | ६.०० |

(२) वसतीगृहाच्या व्यवस्थापनाकरिता देण्यात येणारा निधीकरिता यथास्थिती संबंधित संचालक (उच्च शिक्षण)/संचालक (तंत्रशिक्षण)/संचालक (प्रशिक्षण) हे **“नियंत्रक अधिकारी”** व संबंधित वसतीगृह ज्या शासकीय संस्थेस सोपविण्यात आले आहे. त्या संस्थेचे संचालक/प्राचार्य हे **“आहरण व संवितरण अधिकारी”** राहतील.

(३) विद्यार्थीनींकडून Caution Money म्हणून प्राप्त होणाऱ्या रु.५००/- इतक्या रकमेची स्वतंत्र पावती देण्यात यावी व हा निधी संचालक/प्राचार्य यांच्या स्वीय प्रपंजी खात्यात (PLA Account) जमा करण्यात यावा.

(४) विद्यार्थीनींकडून Caution Money व्यतिरिक्त अन्य शुल्कापोटी प्राप्त होणारा निधीची स्वतंत्र पावती देण्यात यावी आणि हा निधी शासनाच्या खात्यात जमा करण्यात यावा.

(५) वसतीगृहातील ९ पदांवर कंत्राटी तत्वावर करण्यात यावयाच्या नियुक्त्या या दिनांक २१ जून, २०१३ च्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार संबंधित जिल्हाधिकारी यांच्या

अध्यक्षतेखालील समितीव्दारे करावयाच्या आहेत. त्याअनुषंगाने नियुक्त्यांबाबत जिल्हाधिकारी यांचे मदतीने प्राचार्य/संचालक यांनी कार्यवाही करावी.

(६) सदर वसतीगृहे मुलींची असल्याने या वसतीगृहातील “अधिक्षक” या पदावर प्रौढ अनुभवी महिला असावी. या अधिक्षिकेने वसतीगृहात वास्तव्य करणे अनिवार्य राहिल हे निवड प्रक्रियेवेळी प्रकर्षाने निदर्शनास आणण्यात यावे व त्यांच्या आदेशामध्ये तसे नमूद करावे.

संबंधित प्राचार्य/संचालक यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/कार्यालयीन आदेश/वित्तीय नियमावली/भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल/वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०७१५३६५३४६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ainul C Attar
Digitally signed by Ainul C Attar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ainul C Attar
Date: 2015.07.29 11:06:36 +05'30'

(अैनुल अत्तार)

सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
२. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व परीक्षा) मुंबई/नागपूर
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
४. विभागीय आयुक्त (सर्व)
५. जिल्हाधिकारी (सर्व)
६. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई
७. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई
८. प्राचार्य, राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर
९. प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल, जिल्हा रायगड

१०. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था (मुलींची), चंद्रपूर

११. संचालक, शासकीय विज्ञान संस्था, औरंगाबाद, जि. औरंगाबाद

१२. संचालक, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पूर्णा, जि.परभणी

१३. संचालक, शासकीय विदर्भ ज्ञान-विज्ञान संस्था, अमरावती, जि. अमरावती.

१४. प्राचार्य,औद्योगिक प्रशिक्षण संस्था, गंगाखेड, जि. परभणी.

१५. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, हिंगोली, जि. हिंगोली.

१६. प्राचार्य,औद्योगिक प्रशिक्षण संस्था, वसमत, जि. हिंगोली.

१७. प्राचार्य,औद्योगिक प्रशिक्षण संस्था, परभणी.

१८. प्राचार्य,शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम, जि. वाशिम.

१९. प्राचार्य,औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मंगरुळपीर, जि. वाशिम

२०. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

२१. वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१४, व्यय-४), मंत्रालय, मुंबई

२२. नियोजन विभाग (कार्या. १४७५)

२३. कार्यासन-७, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

२४. निवड नस्ती (का-८).